राज्यसेवा परीक्षा -२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिका-यांच्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी-१०) करिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०२५/प्र.क्र.४१/का-७ अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २२ एप्रिल, २०२५.

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय , क्र.टिआरएन २०१३/प्र.क्र ८४/१३/१२-अ, दि. २०.१.२०१४,
२. वित्त विभाग, शासन निर्णय , क्र.पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.२.२०१६,
३. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.टिआरएन०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी,दि.२१.७.२०१७,
४. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.टिआरएन१११७/प्र.क्र.३६/सीपीटीपी,दि.१९.५.२०२२,
५. सामान्य प्रशासन विभाग कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन११२४/प्र.क्र.८४/प्रशि-३,दि.२१.२.२०२५, १२.३.२०२५ व दि.२७.३.२०२५,
६. सामान्य प्रशासन विभागाचे दि.२८.३.२०२५ रोजीचे पत्र,
७. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन, प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे दि.९.४.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेव्दारे सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-ब संवर्गातील पदांसाठी सन २०१४ पासून वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षाच्या कालावधीसाठी एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम वाचा क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-ब (राजपत्रित) संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परिक्षा २०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिवीक्षाधीन कार्यक्रम (सीपीटीपी-१०) मध्ये वाचा क्र.५ च्या आदेशान्वये प्रशिक्षणासाठी रूजू झालेल्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य ) परिक्षा -२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रत्यक्ष प्रशिक्षणासाठी रुजू झालेल्या महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिका-यांची ७ व्या वेतन आयोगानुसार ( S-१५ : ४१८००-१३२३००) या वेतनश्रेणीत वित्त विभागाच्या वाचा क्र.२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार दि.२.४.२०२५ ते दि.१.४.२०२७ या २ वर्षाच्या कालावधीकरिता एकूण ५७ अधिसंख्य पदे निर्माण करण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.५ येथील शासन आदेशातील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२.** सदर ५७ अधिसंख्य पदे आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

**३.** सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा क्र.५ येथील आदेशान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, डीसीपीएस क्रमांक मिळविणे, त्यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे, परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांची सेवा पुस्तके तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या ४ आठवडयात करण्याच्या सूचना आहेत. सबब, सदर आदेशातील निर्देश विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही करण्याकरीता उपायुक्त (प्रशासन), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना नोडल अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

**४.** महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-ब (राजपत्रित) संवर्गातील ५७ अधिसंख्य पदांच्या वेतन व भत्ते यावर येणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५, २०२५-२०२६ व २०२६-२०२७ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-एक्स-१
२२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण ,
०२,समाज कल्याण
००१, संचालन व प्रशासन
०१, महिला व बाल कल्याण संचालनालय
(०१)(०१) महिला व बाल कल्याण संचालनालय (अनिवार्य)
(२२३५-२०७२), ०१-वेतन

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२२१७४७३०६३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.04.22 17:48:21 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन,**

प्रत-

१. महालेखापाल, महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता ),
२. आयुक्त, महिला व बाल विकास,महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व),
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे,
६. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन, प्रशिक्षण संस्था, नागपूर
७. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास,
८. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर,
११. सामान्य प्रशासन विभाग (प्रशि-३) मंत्रालय,मंबई,
१२. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा -१) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३. निवड नस्ती (७-अ)